राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या कार्यक्रमासाठी निर्माण केलेल्या अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः- सा.आ.वि.-३००११/२००/२०१५/ आ-७**

जी. टी. रुग्णालय आवार,१० मजला,
बी- विंग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

दिनांक : २६ मार्च, २०१५

वाचा-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : राआग्र- २००७ / प्र.क्र.८ / आ -७, दिनांक ११ सप्टेंबर, २००७

२) केंद्र शासनाचे , आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र. झेड- १८०१५ /६/२००८-NRHM-II दि.१५ सप्टेंबर, २०१०

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : राआग्र-२०१३ /प्र.क्र. १२१/ आ -७, दिनांक २५ मार्च, २०१३

४) केंद्र शासनाचे , आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र. झेड- १८०१५/ /२०११ - NRHM-II दि.०५ फेब्रुवारी, २०१३

५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : पदनि-२०१५/ प्र.क्र.५/१५ वित्तीय सुधारणा- १ , दिनांक २० फेब्रुवारी, २०१५ .

६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : - सा.आ.वि.-३००११/६७(२)/२०१४-आ -७, दिनांक २६ मार्च, २०१४

७) शासन शुध्दीपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : - सा.आ.वि.-३००११/२३/२०१५-आ -७, दिनांक १७ मार्च, २०१४

८) आयुक्त (कु.क) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र. संआसे/आस्था/टे-३/कक्ष ५/अपदे-२/राग्राआअ/१९५-९/२०१५, दिनांक १३ मार्च, २०१५

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार राज्यात राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान कार्यक्रम राबविण्यासाठी राज्य आरोग्य अभियानाची स्थापना करण्यात आली आहे. राज्यातील जनतेला गुणवत्तापुर्ण आरोग्य सेवा उपलब्ध करून देणे हे अभियनाचे प्रमुख उद्दिष्ट आहे. सदर अभियान २०१७ पर्यन्त चालू ठेवण्यासाठी केंद्र शासनाने दिनांक ०५ फेब्रुवारी, २०१३ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. राज्य आरोग्य अभियान स्तरावर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भाधीन दिनांक ११ सप्टेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये पर्यवेक्षण व संनियंत्रण करण्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या सह संचालक ही २ अस्थायी पदे दिनांक २८ फेब्रुवारी, २०१५ पर्यन्त चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्या दिनांक १३ मार्च, २०१५ च्या प्रस्तावानुसार सदर पदांना पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान अंतर्गत संचालक,राज्य आरोग्य अभियान यांच्या स्तरावर निर्माण करण्यात आलेली सह संचालक (वेतनश्रेणी १५,६००-३९,१००, ग्रेड पे ७,९००) ही दोन अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०१५ ते २९.०२.२०१६ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर प्रस्तावावरील खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षातर्गत सन २०१४ -१५ व सन २०१५-१६ या वित्तीय वर्षामध्ये केलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १
सह संचालक, राज्य ग्रामीण आरोग्य अभियान स्तरावर
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०१ - नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा
००१ - संचालन व प्रशासन
(०१) (०१) - आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
(२२१० ००९३)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६१२५६३७०७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.03.26 13:50:37 +05'30'

(मनोहर ठोंबरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सह संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
८. रोख शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (आ. व कु.क.) , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
१०.उप सचिव (आ-७) , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
११.निवड नस्ती (आ-७)